सहायक वनसंरक्षक गट-अ (कनिष्ठ श्रेणी)
संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदलीने
पदस्थापना देणे बाबत.

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

**शासन आदेश क्रमांक : एमएफएस-२०२१/प्र.क्र. १४०/फ-८.**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २३ फेब्रुवारी, २०२२

**संदर्भ**:- १) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. एमएफएस-२०१७/प्र.क्र.७७/फ-८ दि.१३/०९/२०१९ व दि. २१/०९/२०२१

**शासन आदेश :-**

संदर्भाधीन दि.१३/०९/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये वन विभागातील पदांचा सुधारीत आकृतीबंध मंजूर करण्यात आला आहे. सदर आकृतीबंधानुसार मंजूर पदांचे वनवृत्तनिहाय व शाखानिहाय पुर्नगठण दि.२१/०९/२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये करण्यात आले आहे. त्यामुळे वन विभागातील काही पदे निरसीत झाली आहेत. श्री. नितीन चंद्रभान गोंडाणे, सहायक वनसंरक्षक-२, सामाजिक वनीकरण अमरावती या निरसीत पदावर कार्यरत आहेत. त्यांना इतरत्र पदस्थापना देण्याचे शासनाच्या विचाराधीन होती.

२. शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियम आणि शासकीय कामे पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४ (४) व ४ (५) अंतर्गत तरतुदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निरसीत पदावर कार्यरत श्री. नितीन चंद्रभान गोंडाणे, यांची खालील पदावर बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिका-यांचे नाव व पदनाम | बदलीने पदस्थापनेचे पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री. नितीन चंद्रभान गोंडाणे, सहायक वनसंरक्षक-२, सामाजिक वनीकरण अमरावती | सहायक वनसंरक्षक-१, सामाजिक वनीकरण, अमरावती | श्री. पाटोळे यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदी |

**३.** वरील बदलीने पदस्थापना दिलेल्या अधिकाऱ्यांना नियंत्रक अधिकाऱ्यांनी बदलीच्या पदावर हजर होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच, संबंधित अधिकाऱ्यांना बदलीच्या पदावर हजर होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते बदलीच्या पदी कोणत्या दिनांकास हजर झाले, याबाबतची माहिती संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांनी शासनास ananda.shendge@nic.in या ई-मेल संकेतस्थळावर सादर करावी.

**४.** संबंधित अधिकाऱ्यांना शासनाच्या पूर्वपरवानगी शिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये. तसेच महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम १९८१ मधील नियम - ३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्याचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास, ते संबंधित अधिकाऱ्यांना मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत.

**५.** सदर बदली आदेशानुसार संबधित अधिकारी तात्काळ बदलीच्या पदावर हजर न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारे असल्यामुळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांचेविरुद्ध शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

**६.** सदर शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक २०२२०२२३१४००५८६४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANANDA SHANKAR SHENDAGE

Digitally signed by ANANDA SHANKAR SHENDAGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0db7067f83b51744741b4485650edc8705560188be635df819605b4913ead056, pseudonym=F47821202A3D8C06F80E6240CB6E122AFEEDD6F5, serialNumber=DCED31BA3BA0E455430F67304905C6E3544DAE39602268D4CF2844818A1F80A4, cn=ANANDA SHANKAR SHENDAGE
Date: 2022.02.23 14:02:55 +05'30'

**(आनंदा शेंडगे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
२) मा.राज्यमंत्री (वने) यांचे खाजगी सचिव
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य,नागपूर.
४) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य,नागपूर.
५) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य,नागपूर.
६) प्रधान मुख्य वनसंरक्षक ,सामाजिक वनीकरण , महाराष्ट्र राज्य,पुणे.
७) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), नागपूर.
८) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव),प. नागपूर.
९) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक/वन्यजीव )/वनसंरक्षक (प्रादेशिक/वन्यजीव) (सर्व)
१०) वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण (सर्व)
११) वनसंरक्षक (वन्यजीव) (सर्व)
१२) महालेखापाल,महाराष्ट्र-१/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर
१३) जिल्हा कोषागार अधिकारी, (सर्व)
१४) प्रधान सचिव (वने) यांचे स्वीय सहाय्यक
१५) संबंधित अधिकारी ( प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), म.रा.नागपूर यांचे मार्फत)
१६) निवड नस्ती (फ-८ कार्यासन).